राज्यातील मान्यता प्राप्त प्राथमिक,माध्यमिक व उच्चमाध्यमिक, शाळांमध्ये संगणक प्रयोगशाळा, स्थापन करण्यासाठी आमदारांच्या स्थानिक विकास कार्यक्रमातून,आर्थिक सहाय्य घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्र. - सीओएम - २००१/प्र.क्र.१७१/२००१/३९.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ जुलै, २००१.

शालेय शिक्षण विभागाच्या शासन निर्णय क्रमांक आयटीपी २०००/(७२/२०००)/संगणकीकरण कक्ष, दि. ३१/८/२००० अन्वये राज्यातील मान्यताप्राप्त प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये संगणक प्रयोग शाळा स्थापन करण्यासाठी आमदारांच्या स्थानिक विकास कार्यक्रमांतून आर्थिक सहाय्य घेऊन खरेदी करावयाच्या संगणकांच्या किमान विनिर्देशाबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानंतर अनेक शाळांनी त्या किमान विनिर्देशापेक्षा उच्च विनिर्देशाचे संगणक खरेदी केल्याचे शासनास आढळून आले आहे. अशा उच्च विनिर्देशाच्या संगणकांची शाळांमध्ये आवश्यकता नसल्याने आवश्यकतेपेक्षा उच्च विनिर्देशनाचे संगणक खरेदी करणे हा शासकीय रक्कमेचा अपव्यय आहे त्यामुळे या परिपत्रकाव्दारे सर्व मान्यताप्राप्त प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना सूचना देण्यांत येत आहे की, शालेय शिक्षण विभागाच्या शासन निर्णय दिनांक ३१/०८/२००० अन्वये निश्चित केलेल्या संगणकाच्या किमान विनिर्देशानुसारच संगणक खरेदी करण्यांत यावेत. जेणे करुन कमीत कमी खर्चात जास्तीत जास्त संगणक शाळांसाठी घेता येतील.

आदेशानुसार.

रमेश सागर
( डॉ. रमेशचंद्र सागर )
**संचालक तथा सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव,जिल्हा नियोजन व विकास मंडळे,
सर्व जिल्हयांच्या पालक मंत्र्यांचे खाजगी सचिव,
सर्व मा. विधान सभा सदस्य व विधान परिषद सदस्य (सर्व मा. आमदार)
मुख्यमंत्र्यांचे सचिवालय,मंत्रालय,मुंबई
सचिव, शालेय शिक्षण, मंत्रालय, मुंबई

GR-2002 0422 124814000 - 0106

मा. शालेय शिक्षण मंत्री यांचे खाजगी सचिव
मा. शालेय शिक्षण राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
शिक्षण संचालक (प्राथमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे
शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ (राज्य मंडळ), पुणे,
संचालक, महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे,
संचालक, महाराष्ट्र राज्य परीक्षा मंडळ, पुणे,
संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे,
संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक नियोजन व प्रशासन संस्था, औरंगाबाद,
राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
सर्व शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई
सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (माध्यमिक)
सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व सहसचिव, उपसचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी
निवड नस्ती.

--x--

GR-20020422124814000-0104